**राज्याच्या नागरी भागातील सांडपाण्यावर प्राधान्याने प्रक्रिया करण्याच्या धोरण निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.२८७(भाग-१)/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक :- २६ ऑक्टोबर, २०२०**

संदर्भ :-

१) **शासन निर्णय क्रमांक :-** संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२५९/नवि-३३, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७

**प्रस्तावना :-**

मा. राष्ट्रीय हरित लवादामध्ये दाखल मुळ अर्ज क्र. ५९३/२०१७ (पर्यावरण सुरक्षा समिती विरुध्द केंद्र शासन व सर्व राज्य शासन) या प्रकरणी मा. लवादाने दिनांक २८.०८.२०१९ रोजी दिलेल्या निदेशानुसार नागरी भागामध्ये निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर १०० टक्के प्रक्रिया करणे सर्व नागरी स्थानिक संस्थांना बंधनकारक करण्यात आले आहे. या अनुषंगाने राज्यातील एकूण ३९१ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये एकूण अंदाजे ९७५८ एमएलडी इतक्या सांडपाण्यावर प्रक्रिया करण्याची गरज असून यापैकी अंदाजे ७७४७ एमएलडी सांडपाण्यावर प्रक्रिया करण्याची क्षमता शासनाच्या विविध योजनांमधून/नागरी स्थानिक संस्था निधीतून निर्माण करण्यात आली आहे/निर्माणाधीन आहे. उर्वरीत २०११ एमएलडी मलप्रक्रिया क्षमता संबंधीत नागरी स्थानिक संस्थेकडून उभारुन घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. राष्ट्रीय हरित लवादामध्ये दाखल मुळ अर्ज क्र.५९३/२०१७ (पर्यावरण सुरक्षा समिती विरुध्द केंद्र शासन व सर्व राज्य शासन) या प्रकरणी मा. लवादाने दिनांक २८.०८.२०१९ रोजी दिलेल्या निदेशानुसार नागरी भागामध्ये निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावर १०० टक्के प्रक्रिया करणे सर्व नागरी स्थानिक संस्थांना बंधनकारक करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने, राज्याच्या नागरी भागात निर्माण होणा-या सांडपाण्यावर प्रक्रिया करण्याबाबतचा कृती आराखडा व धोरण खालीलप्रमाणे विहित करण्यात येते आहे.

**१.१ राज्यातील महानगरपालिका व नगरपरिषदांसाठी कृति आराखडा : (बृहन्मुंबई वगळता)**

**१.१.१** राज्यातील बृहन्मुंबई वगळता, इतर सर्व महानगरपालिका व नगरपरिषदांमध्ये निर्माणाधीन/प्रगतीपथावर असलेले मलप्रक्रिया प्रकल्प डिसेंबर, २०२४ अखेर पूर्ण करण्यात यावे.

**१.१.२** मा. राष्ट्रीय हरित लवादाने प्रक्रिया क्षमता निर्माण करण्याबाबत दिलेले आदेश व निधीची उपलब्धता विचारात घेता, तसेच नैसर्गिक जलस्रोतांचे प्रदूषण रोखण्याकरिता प्रथम टप्प्यामध्ये नाले अडवून त्यावर प्रक्रिया करण्याच्या अनुषंगाने मलप्रक्रिया क्षमता निर्माण करण्यास प्राधान्य देण्यात यावे. तद्नंतर पुढील टप्प्यामध्ये शहरातील मलसंकलन व्यवस्था निर्माण करण्यात यावी.

१.१.३ राज्यातील १७ अमृत शहरांमध्ये आवश्यक असलेली अतिरिक्त ६६३.९४ दशलक्ष लीटर प्रतिदिन (एमएलडी) मलप्रक्रिया क्षमता ही केंद्र शासन पुरस्कृत नव्याने घोषित होणाऱ्या अमृत-२ किंवा अन्य योजनेतून किंवा राज्य शासनाच्या महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियान योजनेतून मंजूर करण्यात यावी.

१.१.४ राज्यातील १८७ नगरपरिषदांमध्ये आवश्यक असलेली अतिरिक्त ९३७.११ एमएलडी मलप्रक्रिया क्षमता ही १३५ लिटर प्रतिमाणसी प्रतिदिन पाण्याच्या मानकाच्या उपलब्धतेनुसार टप्प्याटप्प्याने राज्य शासनाच्या महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियान योजनेतून मंजूर करण्यात यावी.

१.१.५ उपरोक्त सर्व मलप्रक्रिया क्षमता डिसेंबर, २०२४ अखेर पूर्ण करण्यात यावी.

१.२ बृहन्मुंबई महानगरपालिकेसाठी कृति आराखडा :-

१.२.१ बृहन्मुंबई शहरासाठी २५७७ एमएलडी मलप्रक्रिया क्षमतेची आवश्यकता असून सध्या बृहन्मुंबई मनपामार्फत २४०७ एमएलडी मलप्रक्रिया क्षमतेचे काम स्वनिधीतून प्रगतीपथावर आहे.

१.२.२ सदर निर्माणाधीन क्षमता पूर्ण झाल्यानंतर सुध्दा बृहन्मुंबई शहराच्या भविष्यातील गरजेपोटी अजून १७० एमएलडी मलप्रक्रिया क्षमता निर्माण करण्याची गरज आहे.

१.२.३ सदर १७० एमएलडी मलप्रक्रिया क्षमता निर्माण करण्यासाठी अंदाजे १५४ कोटी इतक्या निधीची व त्याअनुषंगिक मलसंकलन सुविधा उभारण्यासाठी अंदाजे ६४ कोटी अशी एकूण रु. २२३ कोटी इतक्या निधीची गरज आहे. सदर निधी बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या स्वनिधीतून उभारून सदर प्रकल्पाचे काम पूर्ण करण्यात यावे.

१.२.४ त्यानुसार बृहन्मुंबई महानगरपालिकेसाठी खालीलप्रमाणे टप्पेनिहाय कालमर्यादीत आराखडा निश्चित करण्यात आला.

| मलप्रक्रिया क्षमता (एमएलडी) | पूर्ण करण्याची कालमर्यादा |
|---|---|
| ३७ | नोव्हेंबर, २०२० |
| ७४ | डिसेंबर, २०२० |
| ९८२ | मार्च, २०२४ |
| ३६० | मार्च, २०२५ |
| ५०० | मार्च, २०२६ |
| ४५४ | सप्टेंबर, २०२८ |
| **एकूण २४०७ एमएलडी** | |

१.२.५ अशा प्रकारे बृहन्मुंबई शहरातील संपूर्ण मलसंकलन व्यवस्थेसह मलप्रक्रिया क्षमता सप्टेंबर, २०२८ पर्यंत पूर्ण करण्यात यावी.

१.३ राज्यातील नगरपंचायतींसाठी कृति आराखडा :-

१.३.१ राज्यामध्ये एकूण १२५ नगरपंचायती आहेत.

१.३.२ नगरपंचायतीची सरासरी लोकसंख्या ही १५ हजारापेक्षा कमी आहे.

१.३.३ त्यानुसार नगरपंचायत क्षेत्रांमध्ये उपलब्ध पाणीपुरवठा, निर्माण होणारे सांडपाणी बघता आवश्यक असणारी यंत्रणा ही तात्काळ उभी करणे आवश्यक नाही. सबब, विकेंद्रीत सांडपाणी व्यवस्थापन (Decentralized Septage Management) व्यवस्था डिसेंबर, २०२० अखेर निर्माण करण्यात यावी. यासाठी आवश्यक असणारा खर्च हा स्वच्छ भारत अभियानातून करण्यात यावा.

१.४ <u>सांडपाणी पुनर्चक्रीकरण व पुनर्वापर आराखडा :-</u>

१.४.१ राज्यामध्ये नव्याने मलनिस्सारण प्रकल्पाचा डीपीआर तयार करताना, त्यामध्ये प्रक्रियायुक्त सांडपाण्याचे पुनर्चक्रीकरण व पुनर्वापर आराखडयाचा समावेश डीपीआर मध्ये करावा. तद्नंतरच, नवीन प्रकल्पास मंजूरी प्रदान करण्यात यावी.

१.४.२ सध्या प्रगतीपथावर असलेल्या मलनिस्सारण प्रकल्पांची कामे पूर्ण होण्यापूर्वी, प्रक्रियायुक्त सांडपाण्याचे पुनर्चक्रीकरण व पुनर्वापर आराखडा तयार करून त्यास शासनाची मान्यता घेण्यात यावी. तसेच प्रकल्प पूर्ण होताच त्याची अंमलबजावणी करण्यात यावी.

१.४.३ राज्याच्या नागरी भागातील ज्या मलनिस्सारण प्रकल्पांची कामे पूर्ण झाली आहेत. अशा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी पुढील ६ महिन्यांमध्ये प्रक्रियायुक्त सांडपाण्याचे पुनर्चक्रीकरण व पुनर्वापर आराखडयास शासनाची मान्यता घेऊन त्याची अंमलबजावणी करावी.

१.५ <u>नागरी भागातील निर्माण होणाऱ्या सांडपाण्यावरील प्रक्रियेबाबत आराखड्याच्या अंमलबजावणीसाठी कालमर्यादा:-</u>

१.५.१ सदर आराखडयांतर्गत राज्यातील बृहन्मुंबई महानगरपालिका इतर १७ अमृत शहरे, १८७ नगरपरिषदा व नगरपंचायत क्षेत्रांमध्ये सांडपाणी प्रक्रिया व्यवस्था निर्माण करणे आवश्यक आहे. सदर कामाचे स्वरुप व्यापक आहे. हे काम वेळ लागणारे आहे.

१.५.२ त्यानुसार सदर प्रकल्पांच्या अनुषंगाने प्रत्यक्षात सर्वेक्षण करणे, डीपीआर तयार करणे, त्यास सक्षम प्राधिकरणाची तांत्रिक मान्यता घेणे, प्रत्यक्षात प्रकल्प मंजूर करणे यासाठी किमान १ वर्षाचा कालावधी लागणे अपेक्षित आहे.

१.५.३ तसेच प्रकल्पांस मंजूरी दिल्यानंतर त्याचे निविदा प्रपत्र तयार करणे, प्रत्यक्ष निविदा प्रक्रिया राबविणे, एवढया मोठ्या प्रमाणात गुणवत्तापूर्ण मलप्रक्रिया व्यवस्था उभारण्यासाठी मोठया प्रमाणात तांत्रिक मनुष्यबळ, तांत्रिकदृष्टया सक्षम कंत्राटदार उपलब्ध होणे या व अन्य बाबींमुळे प्रत्यक्षात प्रकल्पांची कामे सुरु करण्यासाठी आवश्यक कालावधी लागणार आहे.

१.५.४ प्रत्यक्षात प्रकल्पाच्या कामास सुरवात झाल्यानंतर किमान २४ महिन्यांचा कालावधी प्रकल्प कार्यान्वित होण्यासाठी लागणे अपेक्षित आहे. या सर्व बाबींचा व्यवहार्य विचार करूनच सदर आराखडा पूर्ण करण्यासाठी शासनाने डिसेंबर, २०२४ ही कालमर्यादा प्रस्तावित केली आहे.

०२. हा आराखडा राष्ट्रीय हरित लवादास सादर करण्यात यावा. त्याच्या अमंलबजावणीसाठी डिसेंबर, २०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची राष्ट्रीय हरित लवादास विनंती करण्यात यावी.

**०३.** राज्यातील बृहन्मुंबई वगळता उर्वरीत महानगपालिका व नगरपरिषद क्षेत्रामध्ये मलप्रक्रिया व्यवस्था निर्माण करण्यासाठी आवश्यक निधी हा केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियान-२ किंवा अन्य योजनेतून किंवा राज्य शासन पुरस्कृत महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानातून उभारण्यात यावा. यासाठी आवश्यक खर्च हा नगरविकास विभागाच्या उपलब्ध नियतव्ययातून करण्यात यावा. आवश्यकता भासल्यास या प्रयोजनार्थ अतिरिक्त नियतव्यय वित्त विभागाने उपलब्ध करून द्यावा.

**०४.** नगरपंचायत क्षेत्रामध्ये विकेंद्रीत सांडपाणी व्यवस्थापन (Decentralized Septage Management) व्यवस्था निर्माण करण्यासाठी आवश्यक निधी हा केंद्र शासन पुरस्कृत स्वच्छ भारत अभियानातून उपलब्ध करून देण्यात यावा. यासाठी आवश्यक खर्च हा नगरविकास विभागाच्या उपलब्ध नियतव्ययातून करण्यात यावा. आवश्यकता भासल्यास या प्रयोजनार्थ अरितिक्त नियतव्यय वित्त विभागाने उपलब्ध करून द्यावा.

**०५.** बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रामध्ये मलप्रक्रिया व्यवस्था निर्माण करण्यासाठी आवश्यक निधी हा बृहन्मुंबई महानगरपालिकेने उभारावा.

**०६.** हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाकडून प्राप्त अभिप्राय विचारात घेऊन त्याबाबतच्या मंत्रीमंडळ निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२६१५२१२०८४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2020.10.26 17:00:34 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. महालेखापाल महाराष्ट्र-१, मुंबई.
२. मा. महालेखापाल महाराष्ट्र-२, नागपूर.
३. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री/राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधनसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
६. सर्व सन्माननीय संसद सदस्य/विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
७. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१०. मंत्रालयीन विभाग (सर्व).

११. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा-कुर्ला कॉम्लेक्स,मुंबई.
१२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१४. सर्व विभागीय आयुक्त.
१५. सर्व जिल्हाधिकारी.
१६. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१७. सर्व मुख्य अभियंता/ अधीक्षक अभियंता/ कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१८. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा /नगरपंचायती.
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२०. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२१. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती, (नवि-३३).